दि.०१.११.२००५ पूर्वी पदभरतीची जाहिरात/ अधिसूचना निर्गमित झालेल्या प्रकरणी शासन सेवेत दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर रुजू झालेल्या राज्य शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांना केंद्र शासनाच्या धर्तीवर जुनी निवृत्तीवेतन योजना लागू करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश, क्रमांकः संकीर्ण २०२५/प्र.क्र. १३०/२०२५/आ (वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
**दिनांक : १८ जून, २०२५.**

**संदर्भ** : १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०२३/प्र.क्र.४६/सेवा-४, दि.०२.०२.२०२४.
२) केंद्र शासनाच्या निवृत्तीवेतन व निवृत्तीवेतन धारकांचे कल्याण विभागाचे पत्र क्र. ५७/ ०५/ २०२१- पी व पीडब्ल्यू (बी), दि.०३.०३.२०२३.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- संकीर्ण २०२४/प्र.क्र. १८/सेवा-४, दि.०२.०५.२०२४.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- रानिप्र २०२४/प्र.क्र. ३५/सेवा-४, दि.३०.०५.२०२४.
५) शासन शुध्दीपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- रानिप्र २०२३/प्र.क्र. ५७/सेवा-४, दि.३०.०५.२०२४.
६) शासन आदेश, जलसंपदा विभाग, क्रमांक- संकीर्ण २०२४/(प्र.क्र. २७८/२४)/आ(वर्ग-२), दि.२७.०२.२०२५.
७) शासन आदेश, जलसंपदा विभाग, क्रमांक- संकीर्ण २०२४/(प्र.क्र. १९०/२४)/आ(वर्ग-२), दि.०३.१२.२०२४.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या अधिकारी / कर्मचारी यांची नियुक्ती (Appointed) ज्या पदावर किंवा रिक्त जागेवर करण्यात आली आहे व ज्याची जाहिरात / भरतीची / नियुक्तीची अधिसूचना नवीन निवृत्तीवेतन योजना लागू करण्याच्या अधिसूचनेच्या दिनांकापूर्वी म्हणजेच दि.२२.१२.२००३ पूर्वी निर्गमित झाली आहे व जे दि.०१.०१.२००४ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत दाखल झाले आहेत व ज्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू झाली, त्या केंद्र शासनाच्या अधिकारी / कर्मचारी यांना केंद्रीय नागरी सेवा (निवृत्ती) नियम, १९७२ / २०२१ लागू करण्याचा एक वेळ पर्याय (One Time Option) देणेबाबत, केंद्र शासनाच्या निवृत्तीवेतन व निवृत्तीवेतनधारकांचे कल्याण विभागाच्या संदर्भाधिन क्र.२ येथील कार्यालयीन ज्ञापनान्वये निर्णय घेण्यात आला आहे.

२. केंद्र शासनाच्या उपरोक्त निर्णयाच्या धर्तीवर, राज्य शासनाच्या सेवेत जे अधिकारी / कर्मचारी दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त करण्यात आले आहेत, तथापि त्यांची पदभरतीची जाहिरात / अधिसूचना दि.०१.११.२००५ पूर्वी निर्गमित झालेली आहे अशा राज्य शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्यासाठी एक वेळ पर्याय (One Time Option) संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेला आहे. या निर्णयानुसार जलसंपदा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील श्रीमती नमिता गौरव बसेर (नमिता जग्गनाथ बाहेती) व श्री.प्रशांत वसंत बोरसे या अधिकाऱ्यांचे अर्ज / विकल्प शासनास प्राप्त झालेले आहेत.

३. सदर अधिकाऱ्यांची नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोग, अधिसूचना क्रमांक ३७४ (१)/एक (१/२००४/तीन, दि.१५ सप्टेंबर, २००४ अन्वये, महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा-२००४ मध्ये सरळसेवा भरतीसाठी घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धा परिक्षेच्या जाहिरातीद्वारे करण्यात आली आहे. सदर परीक्षा शनिवार, दि.०५ फेब्रुवारी, २००५ व रविवार, दि.०६ फेब्रुवारी, २००५ रोजी घेण्यात आली होती. महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा- २००४ च्या मागणीपत्रानुसार सन २००४ मध्ये सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धा परीक्षेच्या निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार वर नमूद केलेल्या श्रीमती बसेर व श्री.बोरसे यांची सहायक अभियंता श्रेणी-२ या पदावर शासन निर्णय, दि.०७.०९.२००७ अन्वये नियुक्ती करण्यात आली आहे.

४. संदर्भाधीन क्र. १ येथील वित्त विभागाच्या दि.०२.०२.२०२४ च्या शासन निर्णयामधील तरतुदीस अनुसरुन, वरील नमूद श्रीमती बसेर यांच्या जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ या पदावरील दि.२४.०९.२००७ ते दि.३१.०८.२०१० या कालावधीतील सलग सेवा त्यांच्या दि.०१.०९.२०१० पासूनच्या या विभागातील सहायक कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावरील सेवेस फक्त सेवानिवृत्ती उपदानाच्या प्रयोजनार्थ जोडून देण्यास मान्यता देण्यात आली आहे. तर श्री.बोरसे यांच्या जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ या पदावरील दि.०१.१०.२००७ ते दि.३१.०८.२०१० या कालावधीतील सलग सेवा त्यांच्या दि.०१.०९.२०१० पासूनच्या या विभागातील सहायक कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावरील सेवेस फक्त सेवानिवृत्ती उपदानाच्या प्रयोजनार्थ जोडून देण्यास मान्यता देण्यात आली आहे.

५. सबब, सदर अधिकाऱ्यांना वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०२.०२.२०२४ मधील तरतूदीनुसार, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ व इतर अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्याबाबत खालीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहे.

**<u>शासन आदेश :-</u>**

जलसंपदा विभागांतर्गत अधीक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गातील श्रीमती नमिता गौरव बसेर (नमिता जग्गनाथ बाहेती) आणि श्री.प्रशांत वसंत बोरसे या अधिकाऱ्यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.४६/सेवा-४, दि.०२.०२.२०२४ मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी नियम, १९९८ व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्यात येत असून त्यांचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | अधिका-याचे नाव व पदनाम | मुळ संवर्ग | सद्याच्या पदस्थापनेचे कार्यालय | अर्ज प्राप्त दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती नमिता गौरव बसेर (नमिता जग्गनाथ बाहेती), अधीक्षक अभियंता | सहायक अभियंता श्रेणी-२ | अधीक्षक अभियंता तथा उप सचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई | ०५.०४.२०२४ |
| २ | श्री.प्रशांत वसंत बोरसे, अधीक्षक अभियंता | सहायक अभियंता श्रेणी-२ | प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे | २१.०२.२०२४ |

२.	वरील अधिकाऱ्यांनी जुनी निवृत्ती वेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्याचा पर्याय विहित मुदतीत सादर केलेला आहे.

३.	वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०२.०२.२०२४ नुसार, वरील विवरणपत्रात नमूद केलेल्या अधिकाऱ्यांना जुनी निवृत्तीवेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्यात येत असल्यामुळे त्यांचे नव्याने भविष्यनिर्वाह निधी (GPF) खाते तात्काळ उघडण्यात यावे. तसेच, सदर अधिकाऱ्यांचे राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली (NPS) मधील खाते बंद करुन, त्यातील अधिका-यांच्या हिश्याची रक्कम देय / अनुज्ञेय व्याजासह संबंधित अधिका-यांच्या नव्याने उघडण्यात येणा-या भविष्यनिर्वाह निधी खात्यात जमा करावी.

४.	तसेच, संबंधित अधिकाऱ्यांच्या राष्ट्रीय निवृत्तिवेतन (NPS) खात्यातील राज्य शासनाच्या हिश्याची रक्कम देय / अनुज्ञेय व्याजासह राज्याच्या एकत्रित निधीत वळती करण्यात यावी

५.	याकरिता संदर्भिय क्र.३ येथील नमूद दि.०२.०५.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी. सदर कार्यवाहीकरीता संबंधित अधिकाऱ्यांच्या संबंधित आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी (लेखा विभाग) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

६.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०६१८१७२३४१३७२७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SUHAS BAJIRAO JADHWAR

Digitally signed by SUHAS BAJIRAO JADHWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=0de66b4d57847be117776aeaf9e53c5b70f1b8d7fdab972d3d1e2c6397e1faa5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F66717B05E42A313D9839BD11E491F5C5F850C51D1F3CB32930D359D7331FF36, cn=SUHAS BAJIRAO JADHWAR
Date: 2025.06.18 17:24:19 +05'30'

**( सुहास जाधवर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२. सचिव (लाक्षेवि)/सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. सर्व संबंधित मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६. उप सचिव (सेवा-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. संबंधित अधिकाऱ्यांचे आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी (लेखा विभाग).
८. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय,
११. सर्व संबंधित अधिकारी.
१२. कार्यासन अधिकारी (रोखशाखा/क्षेप्र/आ(मंत्रालय)), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. आ(वर्ग-१) कार्यासन संग्रहार्थ.